मा. औद्योगिक न्यायालय, चंद्रपूर यांनी तक्रार युएलपी क्र.८/२००५ मध्ये दिनांक २१.११.२००९ रोजी दिलेल्या <u>निर्णयाची अंमलबजावणी करणेबाबत.</u>
श्रीमती मंजूळाबाई देवराम गेडाम

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.एस-३०/२०१३/प्र.क्र. १७९/फ-९**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- १३ ऑक्टोबर, २०१५**

<u>वाचा</u> :- अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-७(२)/आस्था-३/वम/प्र.क्र.८३/१०-११/२८/१५-१६, दिनांक २२.७.२०१५

<u>प्रस्तावना</u> :-

ताडोबा राष्ट्रीय उद्यान अंतर्गत मोहर्ली वनपरिक्षेत्रात श्रीमती मंजूळाबाई देवराव गेडाम या दिनांक १.४.१९९० पासून रोजंदारीवर कामावर होत्या. श्रीमती मंजूळाबाई गेडाम यांना कामावर कमी केल्यामुळे त्यांनी मा. औद्योगिक न्यायालय, चंद्रपूर येथे दाखल केलेल्या तक्रार युएलपी क्र. ८/२००५ मध्ये मा. औद्योगिक न्यायालयाने दिनांक २१.११.२००९ रोजी शासनाच्या विरूध्द निर्णय दिला. दिनांक २१.११.२००९ च्या निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, नागपूर येथे दाखल केलेली रिट याचिका क्रमांक १७९/२०१३, विलंबाच्या कारणास्तव दिनांक १०.१.२०१३ रोजी खारीज केली. मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ यांनी दिनांक १०.१.२०१३ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द एल.पी.ए. दाखल करण्यास विधी व न्याय विभागाने मान्यता दिली नाही. त्यामुळे श्रीमती मंजूळाबाई गेडाम यांना कायम करून, कायमपणाचे फायदे देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा. औद्योगिक न्यायालय, भंडारा यांनी तक्रार युएलपी ८/२००५ मध्ये दिनांक २१.११.२००९ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सदर प्रकरणी जबाबदार असणाऱ्या संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्याविरुध्द जबाबदारी निश्चित करण्याच्या अधिन राहून, श्रीमती मंजूळाबाई देवराव गेडाम यांच्याकरिता दिनांक १.११.१९९४ पासून दिनांक २९.२.२०१४ पर्यंत वनमजूराचे १ अधिसंख्य पद निर्माण करण्यात यावे व त्यांना देय असलेली थकबाकीची रक्कम रु.१०,९५,२५६/- (रूपये दहा लाख पंच्यान्नव हजार दोनशे छप्पन्न फक्त) अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरहू तक्रारदाराला अदा करावयाची थकबाकीची रक्कम अचूक असल्याची खातरजमा मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर यांनी करावी.

सदरहू खर्च मागणी क्रमांक सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), ०१- वनीकरण, १०१- वनसंधारण व विकास, १०१ (१०) (१) वनमजूरांच्या अधिसंख्य पदांची निर्मिती (२४०६ १८९८) या लेखाशिर्षातंर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७९/२०१५/व्यय-१०, दिनांक १५.९.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०१३१६४०२६३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TIWARI VIRENDRA RAMBAHAL

Digitally signed by TIWARI VIRENDRA RAMBAHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST,CID - 917243, postalCode=400032, st=Maharashtra, cn=TIWARI VIRENDRA RAMBAHAL
Date: 2015.10.13 16:41:33 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, ताडोबा अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
६. कार्यासन अधिकारी, व्यय- १०, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन अधिकारी, सा.प्र.वि./१२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल-II (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
१०.ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.फ-९ कार्यासन,महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२ ( निवड नस्ती)